**<u>पदस्थापना</u>**
**उप अभियंता (यांत्रिकी)**
**सार्वजनिक बांधकाम विभाग.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस-२०१८/ प्र.क्र. २४० /सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १२.१२.२०१८

## शासन आदेश

जलसंपदा विभागाने, दिनांक ३१.१०.२०१८ व दिनांक १३.११.२०१८ च्या आदेशान्वये त्यांच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या खालील तक्त्यात नमूद उप अभियंता (यांत्रिकी) यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने या विभागास उपलब्ध करून दिलेल्या आहेत. त्यानुसार सदरहू उप अभियंता ( यांत्रिकी) यांना सार्वजनिक बांधकाम विभागात पदस्थापना देण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती.

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने खालील तक्त्यात नमूद उप अभियंता ( यांत्रिकी) यांची सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत रिक्त असलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उप अभियंता ( यांत्रिकी) यांचे नांव | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|
| १ | श्री.प्रमोद एकनाथ बोंडे | सा.बां.( यांत्रिकी) उप विभाग, चंद्रपूर |
| २ | श्री.अशोक उत्तम पुरी | सा.बां.( यांत्रिकी) उप विभाग, मुंबई |
| ३ | श्री.अमरिश निशानाथ वाघधरे | सा.बां.( यांत्रिकी) उप विभाग, गडचिरोली |
| ४ | श्री.संतोष गोरक्ष लोहार | उप अभियंता (यांत्रिकी), सा.बां.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ५ | श्री.श्रीकांत जगन्नाथराव जोशी | सा.बां.( यांत्रिकी) उप विभाग, अमरावती |

३. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी उपरोक्त उप अभियंता ( यांत्रिकी) यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. उपरोक्त उप अभियंता ( यांत्रिकी) यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल. तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही, याची जाणीव सबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील, याचीही नोंद घ्यावी.

४. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी उपरोक्त उप अभियंता (यांत्रिकी) यांनी पदभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी बदलीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणे करुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज स्वीकारु नयेत/ मंजूर करु नयेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१२१५३५३२२८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mridula Sanjeev Deshpande

Digitally signed by Mridula Sanjeev Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b989f11a955bd12836202040b21122502b1ac600cf24865b3b7d7169e14596c4, cn=Mridula Sanjeev Deshpande
Date: 2018.12.12 15:38:57 +05'30'

**(मृ.सं.देशपांडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर

२. प्रधान सचिव ( ज.सं.प्र.व नि), जलसंपदा विभाग, मुंबई

३. मुख्य अभियंता ( यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक

४. अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई

५. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे/मुंबई

६. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर/गडचिरोली/अमरावती

७. उपरोक्त उप अभियंता ( यांत्रिकी) यांना संबंधित मुख्य अभियंता ( यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक/ अधीक्षक अभियंता ( यांत्रिकी), सा.बां.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांच्या मार्फत.

८. मा. मंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम) /मा.राज्यमंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा. राज्यमंत्री, सा.बां., (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

९. प्रधान सचिव (सा.बां.)/सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.

१०. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.